

## जय गजानन ४६

कैलासपर्वतावर मदासुर आपल्या समस्त सेनानायकांसह अनेकानेक सुखांचा अनुभव घेत होता. मात्र समाधान मानणे हे दैत्यांच्या स्वभावातच नसते. त्या सेनानायकांच्या मनात देवशत्रुत्व खदखदतच होते. कधी एकदा देवतांचा समूळ विनाश करतो अशी त्यांची वृत्ती होती. त्या मत्सराने त्यांना कैलासातच शांतता लाभत नव्हती. त्यामुळे त्या सगळ्यांनी त्रिपुरासुराला समोर केले आणि त्रिपुरासुराने मदासुराचे कान भरायला सुरुवात केली. ते म्हणाले- 'राजन्, आमचे वचन ऐका. शंकरादिक समस्त देवता शक्तिलोकी गेल्या आहेत. तेथे आदिमायेने त्यांना अभय दिले आहे. देवता आपल्या स्वभावसिद्ध शत्रू आहेत. दैत्यविनाशातच त्यांची ही बुद्धी सतत कार्यशील असते. देवीलोकात ते सगळे एकत्र बसून आपली शक्ती वाढवीत असतील तर ती देवी सुद्धा पक्षपाती आहे. देवतांचेच हित करीत आहे. आपल्या शत्रूंना अभय देत आहे. अतः आपण त्वरीत शक्तिलोकावर आक्रमण करायला हवे. आपण सगळे तेथे जाऊ आणि त्या देवतांचा कायमचा निःपात करून टाकू.'

दैत्यवृत्तीचा असला तरी मदासुर मूलतः एक ऋषीपुत्र होता. उपकारकर्त्याच्या स्मरणाची त्याची वृत्ती पूर्णतः लोपली नव्हती. ब्रह्मांडराज्याची मनीषा असली तरी देवता विनाश हा उद्देश नव्हता. मात्र बाकी संगतीने त्याच्या त्या वृत्तीवर वारंवार आघात होत होते. तरीही त्याची जी थोडीफार विवेकबुद्धी शेष होती त्या आधारे तो म्हणाला- राक्षसवीरांनो! माझे हे समस्त वैभव शक्ति प्रदत्त आहे. तिच्याच प्रसादबले आपण हा विजय प्राप्त करू शकलो. ती माझ्यासाठी परमवंदनीय आहे. मी तिचे भजन करीत असतो. देवता तिला शरण गेल्यात, हे जरी सत्य असले तरी माझ्या भक्तिभावाने देवीचे मन नियंत्रित झाले आहे. त्यामुळेच ती अद्याप त्यांची बाजू घेऊन आपल्यावर आक्रमण करण्यासाठी आलेली नाही. देवता सध्या तिच्या भजनात रत आहेत आणि जे तिच्या भजनी लीन आहेत ते माझ्यासाठी परमवंदनीय आहेत. हे असुरांनो, तुम्हीही त्या परांबेशी वैर करू नये.

मदासुराचे वचन ऐकले. मात्र देवताविनाशानेच मति शांत होईल अशी ठाम विकृत धारणा केलेले ते राक्षसवीर त्याला म्हणाले- हे असुरसम्राट, आपण पुर्वेतिहास आठवून पहा. हिरण्यकश्यपू आदी अनेक दैत्यराज झाले. ब्रह्मदेवादिकांकडून त्यांनी वरदाने मिळविली.

म्हणून काही त्यांनी देवतांचे दास्यत्व स्वीकारले नाही. उलट देवपक्ष सोडून त्यांनी देवता संहारार्थच आपली शक्ती योजिली. जसे ते दोन्ही कश्यपसुत देवतापक्ष त्यागून देवविनाशात रमले. तसेच आपणही करायला हवे. वेदादिकातच पहा, देवता आणि असुर हे परस्पर वैरीच वर्णिले आहेत. आपण सगळे देवी लोकात जाऊ. जर ती आदिमाया आपली बाजू घेईल तर ती आपणास पूज्य असेल. ती आमच्या शत्रू देवतांचा पक्ष घेणार असेल तर ती देखील आमची शत्रू ठरते आणि मग आक्रमणाचा आपल्यावर दोष उरत नाही.

दैत्यांचा हा युक्तिवाद मदासुराला पटला आणि मग मदासुराचे सैन्य शक्तिलोकाच्या द्वारी जमा झाले. प्रथम दूत रूपात तारकासुरास आदिशक्तीच्या समीप पाठविण्यात आले. महामायेला नमन करून त्याने आपल्या कथनास आरंभ केला. 'हे विश्वजननी! मदासुर तुझ्या दर्शनार्थ आला आहे. त्याने मला दूत रूपात समोर पाठविले आहे. त्याचे भावपूर्ण वचन कृपया श्रवण कर. तू आमुची कुलदेवी आहेस. आम्ही सर्व तुझ्या चरणाचे दास आहोत. जेथे असुर असतात तेथे देव हतप्रभ असतात. कारण उभयता स्वत:सिद्ध, स्वभावत:च शत्रू आहेत. आम्ही तुला वंदन करतो. मात्र या देवतांच्या विनाशासाठीच आम्ही येथे आलो आहोत. अत: त्यांची पाठराखण करणे सोडून दे. हे जगदंबे! तू कोणता तरी एक पक्ष घे. हाच त्याच्या कथनाचा मथितार्थ आहे.'

महर्षी गृत्समद प्रल्हादास म्हणतात- हे दैत्यराज! त्या तारकासुराचे हे वचन ऐकले आणि अत्यंत क्रोधित झालेली ती आदिमाया म्हणाली- वेदांनी मला जगदंबा म्हटलेले आहे. मग मी एकाचा पक्ष कसा घेणार? माझ्यासाठी जशा देवता तसेच दैत्य. दोघांनीही स्वधर्मानुसार परस्पर द्वेषरहित राहावे हेच उचित. देवतांनी स्वर्गी तर असुरांनी पाताली राज्य करावे. या विपरीत वागणारा माझ्या क्रोधास पात्र ठरतो. जग संचालनासाठी, विश्वनियंत्रणासाठी मग त्याच्या वधासही मी मागेपुढे पाहणार नाही. अत: मदासुरास सांग. माझ्या आज्ञेचे पालन कर. पाताळात परत जाऊन राज्य कर. तेथे सुखाने रहा. त्यातच दैत्यांचे हित आहे. महाशक्तीचे हे वाक्य ऐकले आणि भयरहित तारकासुर परतून म्हणाला, 'हे शक्ते! तू वृथा गर्व करू नकोस. आम्ही हे वैभव काही केवळ आशीर्वादाने फुकटात मिळवलेले नाही. तपस्या बलाने ते हस्तगत केले आहे. शत्रुपक्षाबाबत आता आम्ही अधिक दक्ष झालो आहेत. हे संपूर्ण जगत् कर्माधीन आहे. जो जशी कर्मे करतो त्याला तशी फळे मिळतात. त्यात तू काय करणार आहेस? मदासुर स्वकर्माने बलशाली झाला आहे. ब्रह्मांडाधिपती झाला आहे आणि आता देवता हननार्थ येथे आला आहे. तू आपल्या या देवसैन्यासह सिद्ध हो. मी माझ्या राक्षसी सेनेसह आत्ता परतून येतो.'

असे बोलून युद्धासाठी जणू आव्हान करून तो क्रुरमती तारकासुर मदासुराकडे परतला.

***